सन २०१४-१५ करीता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत सचिव, आदिवासी विकास यांच्या दालनाच्या नुतनीकरणाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मंजूरी प्रदान करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः केंद्रीय-२०१७/प्र.क्र.३४/का-१९

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: २९/०४/२०१७

वाचा-

१. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र. केंद्रीय-२०१४/प्र.क्र.७७/का-१९, दि.३१/०३/२०१५

प्रस्तावना -

केंद्र शासनाने त्यांच्या भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत अनुदान या योजनेखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात Institutions Strengthening योजनेकरीता एकुण १४६८.१७ लक्ष निधी मंजूर केला आहे. सदर निधी संदर्भ क्र. १ वरील शासन निर्णयान्वे आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरीत करण्यात आला आहे. सदर मंजूर मार्गदर्शक सुचनांनुसार आदिवासी विकास विभागाच्या पहिल्या मजल्यावरील रुम नं.१३५ येथे मा. सचिव, आदिवासी विकास यांच्या केबीन दुरुस्तीसह फर्निचर व्यवस्था तसेच वायरींग व्यवस्था करण्यासाठी अंदाजपत्रके सार्वजनिक बांधकाम विभागाच्या तांत्रिक मान्यतेने प्राप्त झाली आहेत. सदर अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

### शासन निर्णय-

या निर्णयाद्वारे आदिवासी विकास विभागाच्या पहिल्या मजल्यावरील रुम नं.१३५ येथे मा. सचिव, आदिवासी विकास यांच्या केबीन दुरुस्तीसह फर्निचर व्यवस्थेकरीता स्थापत्य कामाच्या खर्चाचे रू. २७,२७,४७८/- व वायरींग व्यवस्थेकरीता विद्युत कामाच्या खर्चाचे रु. २,१०,८३३/- अशाप्रकारे एकुण रु. २९,५९,४९३/- किंमतीच्या अंदाजपत्रकांना सार्वजनिक बांधकाम विभागाने तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. सदर रु. २९,५९,४९३/- किंमतीच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता प्रदान करीत आहे.

३. या कामांची निविदा प्रक्रिया प्रचलित कार्यपद्धती / नियमांचे पालन करुन करावी. तसेच बांधकामासंबधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवाल शासनास विहित प्रपत्रात सादर करावे. सदर कामांकरीता निधी कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई यांना स्थापत्य कामांकरीता व कार्यकारी अभियंता, दक्षिण मुंबई विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांना विद्युत कामांकरीता मंजूर निधी उपलब्ध करून देण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची राहील. सदर कामांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची राहील.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२९१३५४११६०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Lalitkumar R Dhaygude

Digitally signed by Dr. Lalitkumar R Dhaygude
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77ee43feb646b7ae43865425ca1d67a75cd7607faeae62a4e9bad488155d6d28, cn=Dr. Lalitkumar R Dhaygude
Date: 2017.04.29 13:55:46 +05'30'

(डॉ.ल.रं.धायगुडे)
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. वरीष्ठ स्वीय सहायक, सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
४. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई
५. आयुक्त, आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे
७. उपसचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
८. संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
९. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.